सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण (४४०६ ०४९२) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांकः साववि-२०२०/प्र.क्र.४४/फ-११
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २१ जुलै, २०२०

वाचा:-

१)वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क.६४/अर्थ-३, दि.१६.०४.२०२०
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क.६५/अर्थ-३, दि.०४.०५.२०२०
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/ यो/चाबा/ प्र.क्र.०३/४१/२०२०-२१,दि. ०९.०६.२०२०.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक, ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/ यो/चाबा/ प्र.क्र.२१(१९-२०)/(SFD)/५७/२०२०-२१,दि. २३.०६.२०२०.
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक, ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/ यो/नबाप्र/ प्र.क्र.०६/७७/२०२०-२१,दि. ०७.०७.२०२०

प्रस्तावना:-

वन आणि वनेतर क्षेत्रात वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता राज्य योजनेंतर्गत सन २०२०-२१ करीता **"सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम ( ४४०६ ०४९२ )"**या योजनेंतर्गत रु.१०४७५१.०० लक्ष इतका निधी (**०२-मजूरी** रु.६६३५०.७९ लक्ष + **२१ पुरवठा व सामुग्री**- रु.३८४००.२१ लक्ष) अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

२. तथापि, मार्च २०२० पासुन महाराष्ट्रात कोविड-१९ च्या संसर्गजन्य रोगाचा प्रादूर्भाव होऊन कोरोनाग्रस्त बाधित रुग्णांच्या संख्येत वाढ होत आहे. या महामारीवरील प्रतिबंधात्मक उपाययोजना म्हणून संपूर्ण देशात दि.२४.३.२०२० पासून टाळेबंदी ( लॉकडाऊन ) जाहीर करण्यात आली असून अनेक निर्बंध घालण्यात आले आहेत. सदर निर्बंधामुळे राज्याच्या कर व करेतर महसूलात घट होऊन राज्याच्या अर्थव्यवस्थेवर विपरित झाला आहे. याचाच परिणाम म्हणून वित्त विभागाने दिनांक ४ मे २०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये मूळ अर्थसंकल्पित रकमेच्या ३३ टक्के निधी कार्यक्रमांतर्गत खर्चासाठी उपलब्ध होईल या सुत्राच्या अधीन राहून निधीचे नियोजन करण्याबाबत सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार संदर्भीय पत्र ३,४, व ५ अन्वये प्रधान मुख्य वन सरंक्षक ( वनबल प्रमुख ) कार्यालयाकडून९ मुळ अर्थसंकल्पित तरतूदीच्या ३३ % मर्यादेत खालीलप्रमाणे विभागणी प्रस्तावित आहे.

( रु. लक्ष )

| अ.क्र. | सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण | मूळ अर्थसंकल्पित निधी | ३३ % मर्यादेत प्रस्तावित तरतूद | जुलै ते सप्टेंबर २०२० करिता आवश्यक निधी | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | ०२ - मजूरी | २१ -सामग्री पुरवठा |
| १ | वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम | ३५०००.०० | २००००.०० | ८९९९.९८ | १०००.०० |
| २ | महत्वाच्या रस्त्यांच्या दुतर्फा टेकडयांचे हरितीकरण | ५००.०० | १५०.०० | ६७.५० | ७.५० |
| ३. | महत्वाचे रस्ते/ रेल्वे / कालवे/ दुतर्फा वृक्ष लागवड | ६९२५१.०० | १५०५६.०० | ६७७५.२२ | ७५२.८२ |
| | **एकूण** | **१०४७५१.००** | **३५२०६.०** | **१५८४२.७०** | **१७६०.३२** |

३. वित्त विभागाने संदर्भ क्र. १ येथील शासन परिपत्रकाच्या अधीन राहून १० % च्या मर्यादेत **०२- मजूरी या उद्दिष्टाकरिता ६६३५.१० लक्ष** व २१ साहित्य या उद्दिष्टांतर्गत रु. ३८४०.०० लक्ष निधी असा एकूण रु.१०४७५.१ लक्ष निधी अर्थसंकल्पिय प्रणालीवर वितरित केला आहे. तथापि, माहे जुलै, ऑगस्ट, सप्टेंबर २०२० करिता वरील दोन्ही उद्दिष्टांतर्गत ०२- मजूरी - रु. १५८४२.७० लक्ष व २१-सामुग्री पुरवठा - रु. १७६०.३२ लक्ष मिळून एकूण रु. १७६०३.०२ लक्ष निधी वितरणास मान्यता देण्याची विनंती वित्त विभागास करण्यात आली होती.

४. सदर विनंतीच्या अनुषंगाने वित्त विभागाने २१- सामग्री पुरवठा या उद्दिष्टाकरिता अधिक ५ % व ०२- मजुरीकरिता अधिक २५ % (जुलै २०२० करिता १५-% व ऑगस्ट-२०२० करिता१० % ) निधी वितरणास मान्यता दिलेली आहे. त्यास अनुसरुन सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण या योजनेंतर्गत खालील तीन योजनांसाठी माहे जुलै -२०२० करिता निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

| अ.क्र. | सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण | मूळ अर्थसंकल्पित निधी | ३३ % मर्यादेत प्रस्तावित तरतूद | संपूर्ण वर्षाकरिता बीडीएस वर वितरित निधी | | माहे जुलै-२०२० करिता आवश्यक निधी | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | ०२ - मजूरी | २१ - सामग्री पुरवठा | ०२ -मजूरी | २१ -सामग्री पुरवठा |
| १ | वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम | ३५०००.०० | २००००.०० | | | ५९९९.९८ | ६६६.६६ |
| २ | महत्वाच्या रस्त्यांच्या दुतर्फा टेकडयांचे हरितीकरण | ५००.०० | १५०.०० | | | ४५.०० | ५.०० |
| ३. | महत्वाचे रस्ते/ रेल्वे / कालवे/ दुतर्फा वृक्ष लागवड | ६९२५१.०० | १५०५६.०० | | | ४५१६.८२ | ५०१.९० |
| | **एकूण** | **१०४७५१.००** | **३५२०६.०** | **१६५८७.७** | **३८४०.००** | **१०५६१.८०** | **११७३.५६** |

**शासन निर्णय :-**

सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात **(००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६०४९२ )** या योजनेंतर्गत प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार तीन योजनांसाठी बीडीएस प्रणालीवर उपलब्ध करण्यात आलेला निधी खालील प्रमाणे वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

( रु. लक्ष )

| अ. क्र. | सामुहिक पातळीवर ठोस सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण | मूळ अर्थसंकल्पित निधी | ३३ % मर्यादेत प्रस्तावित तरतूद | बीडीएस प्रणालीवर वितरित तरतूद | | माहे जुलै २०२० करिता वितरित निधी | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | ०२- मजूरी | २१ साहित्य | ०२- मजूरी | २१ साहित्य |
| १ | वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम | ३५०००.०० | २००००.०० | | | | |
| २ | महत्वाच्या रस्त्यांच्या दुतर्फा टेकडयांचे हरितीकरण | ५००.०० | १५०.०० | | | | |
| ३ | महत्वाचे रस्ते/ रेल्वे / कालवे/ दुतर्फा वृक्ष लागवड | ६९२५१.०० | १५०५६.०० | | | | |
| | एकूण | १०४७५१.०० | ३५२०६.०० | १६५८७.७० | ३८४०.०० | ९९५२.६२ | ११७३.५६ |

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. संदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. सदर निधी वितरित करण्यापूर्वी प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) यांनी सदर योजनेसाठी, सन २०१९-२० करिता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी तसेच वृक्ष लागवडीपैकी जिवंत असलेल्या रोपांच्या टक्केवारीनुसार निधी वितरित/निधीचा वापर करण्यात यावा. या अटीच्या अधीन निधी वितरणाची कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ व २ येथील परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

५. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

६. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**“मागणीक्र.सी-१०,**
**४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च,**
**(००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन (४४०६ ०४९२ ).**
**०२- मजूरी ,२१ सामग्री पुरवठा**

७ सदर शासन निर्णय संदर्भ क्रमांक १ व २ येथील वित्त विभागाच्या संदर्भिय शासन परिपत्रक व शासन निर्णयानुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १८७/ व्यय-१०, दि. १३.०७.२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००७२११७५०५९३९१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

ण्महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2020.07.22 14:15:36 +05'30'

**( अरविंद आपटे )**
**सह सचिव ( वने)**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक ( प्रादेशिक ) (११ वृत्त )
५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त )
६. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे )
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र व व , , मुंबई व नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई४०० ०३२.
१०. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
११. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. निवडनस्ती फ-११.